दिनांक १.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या निवृत्ती वेतन विषयक लाभांच्या सुधारणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.२६०/०८/९अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: **३ सप्टेंबर, २०१५**

वाचा :-

१) साप्रवि, शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.२६०/०८/९-अ, दि. ६.१०.२००८
२) साप्रवि, शुध्दीपत्रक क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.२६०/०८/९-अ, दि. १८.१२.२००८
३) साप्रवि, पृष्ठांकन क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.४६/२००८/वेनिक, दि. ३१.१०.२००८
४) साप्रवि, पृष्ठांकन क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.४६/२००८/वेनिक, दि. २.१२.२००८
५) साप्रवि, पृष्ठांकन क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.४६/२००८/वेनिक, दि. ३०.३.२०१३
६) साप्रवि, शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे ११०८/प्र.क्र.२६०/०८/९-अ, दि. ४.१२.२०१३
७) केंद्र शासन, कार्मिक, लोक तक्रारी तथा निवृत्ती वेतन मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापन क्रमांकः ३८/३७/०८-P&PW(A), दि. ३०.७.२०१५
८) केंद्र शासन, कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे पत्र क्रमांकः २५०१४/१/२०१३-AIS, दि. १७.८.२०१५

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या कार्मिक, लोक तक्रारी तथा निवृत्ती वेतन मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापने क्र. ३८/३७/०८-P&PW (A), दि. २८.१.२०१३ व दि. १३.२.२०१३ च्या अनुषंगाने दि. १.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन सुधारणेबाबत संदर्भ क्र. ६ येथील नमूद शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये दि. १.१.२००६ पूर्वीच्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील सेवानिवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतनधारकांचे सेवानिवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन सुधारित करुन दि. २४.९.२०१२ पासून त्याचे प्रदान संबंधित निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतन धारकांना करण्याबाबत व तदनंतर संबंधितांचे सुधारित निवृत्ती वेतन प्रदान आदेश निर्गमित करण्याबाबत अधिदान व लेखा अधिकारी/ जिल्हा कोषागार अधिकारी तसेच महालेखापाल कार्यालय, मुंबई यांना विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार संबंधित निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन धारकांना दि. २४.९.२०१२ पासून सुधारित दराने सेवानिवृत्ती वेतन / कुटुंब निवृत्ती वेतन प्रदान करण्यात येत आहे. संदर्भ क्र. ७ येथील केंद्र शासनाच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये सुधारित निवृत्तीवेतन/ कुटुंब निवृत्तीवेतनाचा लाभ संबंधितांना दि. १.१.२००६ पासून देण्याबाबत निर्णय घेतला आहे. सदर सुधारणांच्या अनुषंगाने दि. १.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांचे निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतन दि. १.१.२००६ पासून सुधारित करण्याची करणे आवश्यक झाले आहे.

## शासन निर्णय :-

केंद्र शासनाच्या उपरोल्लिखित दि. २८.१.२०१३ व दि. ३०.७.२०१५ च्या कार्यालयीन ज्ञापनांतील सूचना अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना जशाच्या तशा लागू करण्यात आल्या आहेत. सदर सुधारणांचा लाभ निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन धारकांना दि. २४.९.२०१२ पासून लागू करण्यात आला आहे. या संदर्भात केंद्र शासनाच्या उपरोल्लिखित दि. ३०.७.२०१५ च्या कार्यालयीन ज्ञापनातील आदेश महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील दि.

१.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या निवृत्तीवेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन धारकांना लागू करुन त्यानुसार कार्यवाही करण्यास शासन मान्यता देत आहे. या अनुषंगाने निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतन सुधारणे संदर्भात पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**दि. १.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्ती झालेल्या अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतनात सुधारणा -**

१. दि. १.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या अखिल भारतीय सेवेतील निवृत्ती वेतनधारक/ कुटुंबनिवृत्ती वेतनधारकांचे निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतन उपरोल्लिखित केंद्र शासनाच्या दि. २८.१.२०१३ व दि. १३.२.२०१३ च्या कार्यालयीन ज्ञापनामध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारित करुन दि. १.१.२००६ पासून त्याचे प्रदान करण्यात यावे.

२. साप्रवि शासन निर्णय दि. ४.१२.२०१३ अन्वये दि.१.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन सुधारणांचा लाभ दि. २४.९.२०१२ पासून अनुज्ञेय करण्यात आला होता. सदर लाभ आता दि. १.१.२००६ पासून अनुज्ञेय राहील. त्या अनुषंगाने दि. १.१.२००६ ते २३.९.२०१२ या कालावधीतील सुधारित निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतना पोटी येणारी थकबाकी संबंधितांना प्रदान करण्यात यावी. थकबाकी प्रदान करण्याची कार्यवाही, निवृत्ती वेतन संवितरण अधिकारी (यथाशक्ती अधिदान व लेखा अधिकारी किंवा जिल्हा कोषागार अधिकारी) यांनी करावी.

३. दि.१.१.२००६ पासून अनुज्ञेय करण्यात आलेल्या सुधारित निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाचा तपशील निवृत्तीवेतन प्रदान आदेशामध्ये समाविष्ट करण्यासाठी केंद्र शासनाच्या दि.१४.१०.२००८ च्या कार्यालयीन ज्ञापना-सोबतच्या विवरणपत्र-III मध्ये अधिदान व लेखा अधिकारी किंवा जिल्हा कोषागार अधिकारी यांनी सुधारित माहिती भरुन महालेखापाल कार्यालय, मुंबई यांच्याकडे पाठवावी व त्याची एक प्रत संबंधित प्रशासकीय विभागास पाठविण्यात यावी.

४. महालेखापाल कार्यालय, मुंबई यांनी उपरोक्त माहितीच्या आधारे संबंधितांचे सुधारित निवृत्तीवेतन/ कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान आदेश (Revised Pension Payment Order) निर्गमित करावेत.

५. या संदर्भातील होणारा खर्च अखिल भारतीय सेवेतील सेवानिवृत्त अधिका-यांचा निवृत्तीवेतनाचा खर्च ज्या लेखाशिर्षामधून भागविला जातो त्याच लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

६. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९३/१५/सेवा-४, दि. २५.८.२०१५ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०३११४११५९१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2015.09.03 14:54:14 +05'30'

**सु. ह. उमराणीकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/ सचिव
३. सर्व विधानसभा/ विधानपरिषद सदस्य
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे/ मुंबई
८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
९. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. वित्त विभाग/ सेवा-४, अर्थसंकल्प-२५, व्यय-४
१३. सहायक संचालक (लेखा) (भापोसे कक्ष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
१४. सहायक संचालक (लेखा) (भावसे कक्ष), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
१५. महासंचालक आणि पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली
१८. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सीडीओ बॅरेक क्र.१, योगक्षेमसमोर, नरीमन पॉईंट, मुंबई
२०. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई ४०००२५
२१. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, दादर, मुंबई ४०००२५
२२. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई ४०००२१
२३. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०००२८
२४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०००१३
२५. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई ४००००१
२६. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४००००४
२७. सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन ९, १०, १९ व २६
२८. निवड नस्ती